महाराष्ट्र ( कारखान्यांना पुरविण्यात आलेल्या ) ऊसाच्या दराचे विनियमन अधिनियम,२०१३ मधील कलम ३ मधील तरतुदीनुसार मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या ऊस नियंत्रण मंडळामध्ये अशासकीय सदस्यांची नियुक्ती रद्द करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः ससाका-२०१८/प्र.क्र.१६९/२५-स,**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२,

**दिनांक: ३१.३.२०२०**

**वाचा ; -**

१. सन २०१३ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. ३३, विधि व न्याय विभाग निर्णय क्र. १६६२/बी, दि. २४ डिसेंबर,२०१३

२. शासन अधिसूचना, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.ससाका-२०१३/ प्र.क्र.१४४/ २५-स, दिनांक २३ मे, २०१४.

३, शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांकः ससाका-२०१८ /प्र.क्र.१६९ /२५-स, दिनांक २९.८.२०१८

४. साखर आयुक्त, पुणे यांचे पत्र क्रमांक सा आ/कक्ष -७/अर्थ-१/ऊनिमं/अशासकीय सदस्य/२०१९/ ८७७/७५६१ दि.१०.१२.२०१९

**शासन निर्णय-**

मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या ऊस नियंत्रण मंडळामध्ये महाराष्ट्र ( कारखान्यांना पुरविण्यात आलेल्या ) ऊसाच्या दराचे विनियमन अधिनियम,२०१३ मधील कलम ३ (४)(५)(६) (७) मधील तरतुदींच्या आणि महाराष्ट्र (कारखान्यांना पुरविण्यात आलेल्या) ऊसाच्या दराचे विनियमन नियम, २०१६ मधील नियम ४ मधील तरतुदींच्या अधीन राहून, शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांकः ससाका-२०१८ /प्र.क्र.१६९ /२५-स, दिनांक २९.८.२०१८ अन्वये सहकारी साखर कारखान्याचे प्रतिनिधी/ खाजगी साखर कारखान्याचे प्रतिनिधी/ शेतकरी प्रतिनिधी यांची अशासकीय सदस्य म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. कलम ३ (५) नुसार सदर नियुक्ती हि राज्य शासनाच्या मर्जीस अधीन राहून केली आहे.

२. साखर आयुक्त, पुणे यांच्या संदर्भीय क्रमांक ४ येथील दि.१०.१२.२०१९ च्या पत्रातील प्रस्तावाच्या अनुषंगाने मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या ऊस नियंत्रण मंडळामधील सदर सहकारी साखर कारखान्याचे प्रतिनिधी/ खाजगी साखर कारखान्याचे प्रतिनिधी/ शेतकरी प्रतिनिधी यांची अशासकीय सदस्य म्हणून केलेल्या नियुक्त्या रद्द करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र ( कारखान्यांना पुरविण्यात आलेल्या ) ऊसाच्या दराचे विनियमन अधिनियम,२०१३ मधील कलम ३ ( ५ ) मधील तरतुदीनुसार मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या ऊस नियंत्रण मंडळामध्ये शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांकः ससाका-२०१८/प्र.क्र.१६९/२५-स, दिनांक २९.८.२०१८ अन्वये खालील नमूद सहकारी साखर कारखान्याचे प्रतिनिधी/खाजगी साखर कारखान्याचे प्रतिनिधी / शेतकरी प्रतिनिधी यांची अशासकीय सदस्य म्हणून करण्यात आलेल्या नियुक्त्या रद्द करण्यात येत आहेत.

| क्र. | सदस्याचे नाव व पत्ता | अशासकीय सदस्य |
|---|---|---|
| १ | श्री. श्रीराम शेटे, कादवा सहकारी साखर कारखाना, जिल्हा नाशिक | सहकारी साखर कारखान्याचे प्रतिनिधी |
| २ | श्री. धर्मराज काडादी , सिद्धेश्वर सहकारी साखर कारखाना मर्या. सोलापूर | सहकारी साखर कारखान्याचे प्रतिनिधी |
| ३ | डॉ. श्री.तानाजीराव सावंत,चेअरमन, भैरवनाथ शुगर वर्क्स लि. जि.उस्मानाबाद | खाजगी साखर कारखान्याचे प्रतिनिधी |
| ४ | श्री नितीन कृष्णकांत मुधोळकर,चेअरमन, मानस ॲग्रो ॲण्ड इंफ्रा. जि.नागपूर. | खाजगी साखर कारखान्याचे प्रतिनिधी |
| ५ | श्री.शिवानंद नागनाथ दरेकर,मु.पो.धोत्री, ता.दक्षिण सोलापूर, जि.सोलापूर. | शेतकरी प्रतिनिधी |
| ६ | श्री.प्रल्हाद रामजी इंगोले, मु.पो.मालेगांव, ता.अर्धापुर, जि.नांदेड. | शेतकरी प्रतिनिधी |
| ७ | श्री.पांडुरंग बळवंत थोरात, मु.पो.आमदाबाद, ता.शिरुर, जि.पुणे. | शेतकरी प्रतिनिधी |
| ८ | श्री.विठ्ठल नामदेव पवार, नामवैभव, केशवनगर,मुंढवा, पुणे. | शेतकरी प्रतिनिधी |
| ९ | श्री.भानुदास सुरेश शिंदे, मौजे कानगांव, ता.दौंड, जि.पुणे. | शेतकरी प्रतिनिधी |

२. साखर आयुक्त तथा सदस्य सचिव,+ उस नियंत्रण मंडळ यांनी महाराष्ट्र ( कारखान्यांना पुरविण्यात आलेल्या ) ऊसाच्या दराचे विनियमन नियम,२०१६ मधील नियम ४ आणि ५ नुसार अर्हताप्राप्त उमेदवारांची नावे सविस्तर माहितीसह शासनास त्वरित सादर करावीत.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२००४२११५२३३३२९०२** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pramod Mankoji Valanj

Digitally signed by Pramod Mankoji Valanj
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation, Marketing and Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e9e7fafe78ccbad1148295b75b2b4a0fc30e01ea267cb61e5d741e2bf211f323, cn=Pramod Mankoji Valanj
Date: 2020.04.21 16:05:42 +05'30'

**( प्रमोद वळंज )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत रवाना:--**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री,यांचे प्रधान सचिव
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४. मा. मंत्री (सर्व),मंत्रालय, मुंबई
५. मा. राज्यमंत्री (सर्व), मंत्रालय, मुंबई
६. मा. मुख्य सचिव, तथा अध्यक्ष ऊस नियंत्रण मंडळ , मंत्रालय, मुंबई.
७. मा. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. मा. प्रधान सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग , मंत्रालय, मुंबई.
९. मा. सचिव (कृषि ), कृषि विभाग , मंत्रालय, मुंबई
१०.सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
११.साखर आयुक्त, तथा सदस्य सचिव ऊस नियंत्रण मंडळ , पुणे,
१२.*श्री. श्रीराम शेटे, कादवा सहकारी साखर कारखाना, जिल्हा नाशिक
१३.*श्री. धर्मराज काडादी , सिद्धेश्वर सहकारी साखर कारखाना मर्या. सोलापूर
१४.*डॉ. श्री.तानाजीराव सावंत,चेअरमन, भैरवनाथ शुगर वर्क्स लि. जि.उस्मानाबाद
१५.*श्री नितीन कृष्णकांत मुधोळकर,चेअरमन, मानस ॲग्रो ॲण्ड इंफ्रा. जि.नागपूर.
१६.*श्री.शिवानंद नागनाथ दरेकर,मु.पो.धोत्री, ता.दक्षिण सोलापूर, जि.सोलापूर.
१७.*श्री.प्रल्हाद रामजी इंगोले, मु.पो.मालेगांव, ता.अर्धापुर, जि.नांदेड.
१८. *श्री.पांडुरंग बळवंत थोरात, मु.पो.आमदाबाद, ता.शिरुर, जि.पुणे.

१९.*श्री.विठ्ठल नामदेव पवार, नामवैभव, केशवनगर,मुंढवा, पुणे.

२०.*श्री.भानुदास सुरेश शिंदे, मौजे कानगांव, ता.दौंड, जि.पुणे.

(* साखर आयुक्त, पुणे तथा सदस्य सचिव, ऊस नियंत्रण मंडळ यांचे मार्फत)

२१.महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, मुंबई, नागपूर,

२२.कार्यकारी संचालक,महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या. मुंबई,

२३.कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखाना संघ मर्यादित,नरिमन पॉईंट, मुंबई. त्यांना विनंती करण्यात येते की, या आदेशाची प्रत त्यांनी राज्यातील सर्व सहकारी साखर कारखान्यांना पाठविण्याची व्यवस्था करावी.

२४.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

२५.निवासी लेखा अधिकारी, मुंबई,

२६.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,

२७.वित्त विभाग, व्यय-२/ कराधान-३/ अर्थसंकल्प-३/ अर्थसंकल्प-१२,

२८. सहसचिव/उपसचिव /अवर सचिव व कक्ष अधिकारी, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय, मुंबई,

२९.निवडसंग्रह (२५-स) सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.